**आय. डी. बी. आय. बँक (IDBI), प्रादेशिक ग्रामीण बँक (RRB) या शासकीय मालकीच्या बँकांना तसेच जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना (DCC) शासकीय बँकींग व्यवहार हाताळण्याची परवानगी देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.- संकीर्ण २०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा.प्रशा.५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ** - १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. डी.डी.ओ.१००५/प्र.क्र.५/कोषा प्रशा-५ , दि. २९ ऑगस्ट,२००५.
२) भारत सरकार, वित्त मंत्रालयाचे दि. २१ ऑगस्ट, २०१९ चे ज्ञापन.
३) भारत सरकार, वित्त मंत्रालयाचे दिनांक १७ डिसेंबर २०१९ चे पत्र.
४) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि. १३ मार्च,२०२०.

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासकीय कार्यालये, सार्वजनिक उपक्रम व महामंडळे इ.कडील बँकींग विषयक व्यवहार केवळ राष्ट्रीयकृत बँकांमार्फत करण्याचे धोरण घोषित करण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने शासकीय बँकींग व्यवहार करण्यास तसेच सार्वजनिक उपक्रम व महामंडळे यांच्याकडील अतिरिक्त निधी गुंतविण्यासाठी केवळ राष्ट्रीयकृत बँकांनाच मान्यता देण्यात आलेली आहे. याशिवाय आहरण व संवितरण अधिकारी यांचे वेतन व भत्ते प्रयोजनासाठीचे कार्यालयीन बँक खाते आणि निवृत्तीवेतन धारकांचे वैयक्तिक निवृत्तीवेतन बँक खाते याबाबत शासनाशी करार केलेल्या राष्ट्रीयकृत बँकांना मान्यता देण्यात आली आहे.

तथाापि,काही बँका जरी प्रत्यक्षात राष्ट्रीयकृत बँका नसल्या, तरी त्या बँका एकतर राष्ट्रीयकृत बँकांनी प्रवर्तित केलेल्या आहेत अथवा त्यांच्या भागभांडवलात मोठया प्रमाणात शासनाचा हिस्सा असल्याने भाग भांडवलाच्या दृष्टीने त्या शासकीय मालकीच्या (Other Public Sector Bank) आहेत. त्यामुळे अशा बँकांना देखील शासकीय बँकींग व्यवहारात सहभागी करुन घेण्याच्या उद्देशाने बँकींग विषयक धोरण सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

१) प्रादेशिक ग्रामीण बँकांच्या (Regional Rural Bank) भाग भांडवलामध्ये भारत सरकार ५०%, पुरस्कर्ता राष्ट्रीयकृत बँक ३५% व राज्यशासन १५% याप्रमाणे हिस्सा आहे. महाराष्ट्रात बँक ऑफ महाराष्ट्र ही राष्ट्रीयकृत बँक, प्रादेशिक ग्रामीण बँकेची पुरस्कर्ता बँक आहे. उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये प्रादेशिक ग्रामीण बँकांना शासकीय बँकींग व्यवहार हाताळण्यास संमती देण्याच्या सूचना प्राप्त झाल्या आहेत. त्यानुषंगाने राज्यातील खालील दोन प्रादेशिक ग्रामीण बँकांना शासकीय बँकींग व्यवहार करण्यास तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळ यांच्याकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) महाराष्ट्र ग्रामीण बँक
(ब) विदर्भ - कोकण ग्रामीण बँक

२) उपरोक्त संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाने कळविले आहे की, "आय.डी.बी.आय." (Industrial Development Bank of India) याबँकेचे ४६.४६ % भागभांडवल भारत सरकारच्या मालकीचे असून भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे (Life Insurance Corporation) "आय.डी.बी.आय." बँकेचे ५१ टक्के भागभांडवल आहे. भारतीय आयुर्विमा महामंडळ हे पूर्णतः भारत सरकारच्या मालकीची कंपनी असल्यामुळे प्रत्यक्ष-अप्रत्यक्षरित्या "आय.डी.बी.आय." बँकेचे ९७.४६% भाग भांडवल हे भारत सरकारच्या मालकीचे आहे. या सर्व बाबींचा विचार करता, "आय.डी.बी.आय." बँकेस शासकीय बँकींग व्यवहार करण्यास तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळ यांच्याकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३) शासकीय निधीची सुरक्षितता विचारात घेऊन, आर्थिकदृष्ट्या सक्षम व नियामानुकूल व्यावसायिकता बाळगणाऱ्या तसेच इतर काही निकष पूर्ण करणाऱ्या जिल्हा मध्यवर्ती सहकारी (District Central Co-operative) बँकांसंदर्भात सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाकडून अभिप्राय घेण्यात आले. सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाने मागील ५ वर्षातील लेखापरिक्षण अहवाल "अ" वर्ग असणाऱ्या १५ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना आर्थिकदृष्ट्या सक्षम व नियमानुकूल व्यवसायिकता बाळगणाऱ्या बँका म्हणून शिफारस केली आहे. त्यानुसार खालील १५ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना शासकीय बँकींग व्यवहार करण्यास तसेच सार्वजनिक उपक्रम / महामंडळ यांकडील अतिरिक्त निधी गुंतवणूकीसाठी मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**शासकीय बँकींग व्यवहार करण्यास मान्यताप्राप्त जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकाची यादी :-**

१. मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
२. ठाणे जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
३. रायगड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
४. रत्नागिरी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
५. सिंधुदुर्ग जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
६. अहमदनगर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
७. पुणे जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
८. सातारा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
९. सांगली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
१०. कोल्हापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
११. लातूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
१२. अकोला जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
१३. भंडारा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
१४. चंद्रपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक
१५. गडचिरोली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक

दरवर्षी बँकांच्या लेखापरिक्षण अहवालात बदल होण्याची शक्यता विचारात घेता, सदर यादी प्रतिवर्षी जुलै महिन्यात सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभागाच्या सल्ल्याने वित्त विभाग सुधारित करेल.

सद्यस्थितीत उपरोक्त बँकांनी वेतन व निवृत्तीवेतन प्रदानाकरीता शासना सोबत आवश्यक करार केलेला नाही. त्यामुळे त्यांनी उचित करार केल्यास, सदर बँकांना वेतन व निवृत्तीवेतन प्रदानाकरीता प्राधिकृत करण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१३१५०००९४८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.08.13 15:05:29 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व मा.विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५.सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे / नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर

२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर

३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१.निवड नस्ती कोषा प्रशा.५.